**राज्यांतर्गत नदीजोड / प्रवाही वळण योजनांचा प्राधान्यक्रम ठरविणे व त्यासाठी प्रवाही वळण योजना तसेच उपसा वळण योजनांचे मापदंड तयार करणे, मराठवाडा प्रदेशात किंवा इतर तुटीच्या प्रदेशात / खोऱ्यात पाणी वळविण्याकरीता प्रस्तावित नदी वळण योजनांचा अहवाल तयार करणे करीता अभ्यासगट स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**सुधारित शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१९/(१८४/२०१९)/जसंअ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ :** १) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.मजनिप्रा-२०१८/३१९/(प्र.क्र.७५/२०१८)/जसं(आस्था), दि.१३/०८/२०१८.
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.मजनिप्रा-२०१८/३१९/(प्र.क्र.७५/२०१८)/जसं(आस्था), दि.१२/१०/२०१८.
३) शासन शुध्दीपत्रक, जलसंपदा विभाग क्र.मजनिप्रा-२०१८/३१९/(प्र.क्र.७५/२०१८)/जसं (आस्था), दि.१२/०८/२०१८.
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.मजनिप्रा-२०१८/३१९/(प्र.क्र.७५/२०१८)/जसं(आस्था), दि.०३/०४/२०१९.

**प्रस्तावना :**

दिनांक २३ एप्रिल, २०१८ रोजी राजभवन, मुंबई येथे प्रादेशिक विकास मंडळाची बैठक संपन्न झाली. सदर बैठकीचे इतिवृत्त मा. राज्यपालांचे सचिव यांचे कार्यालयाचे दिनांक १० मे, २०१८ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर इतिवृत्तानुसार मा. राज्यपाल महोदयांनी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई यांना तीन महिन्यांत खालील मुद्दांबाबत अहवाल मा. राज्यपाल यांच्या कार्यालयास सादर करण्यास सूचित केले आहे.

अ) Devise a formula for the principle of allocation of funds in irrigation sector.

ब) Examine the suggestion regarding diversion of water to Marathwada region from various river basin.

मराठवाडा किंवा इतर तुटीच्या खोऱ्यात विपुलतेच्या खोऱ्यातून पाणी वळविण्यासाठी प्रवाही वळण योजना तसेच उपसा वळण योजनांचे (नदीजोड प्रकल्प) नियोजन करण्यात येत आहे. सदर योजना निधी उपलब्धतेनुसार टप्प्या-टप्प्याने घेण्यासाठी सदर योजनांचे प्राधान्यक्रम ठरविणे आवश्यक आहे या कामासाठी कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांच्या अध्यक्षतेखाली व

प्रत्येक महामंडळातून प्रत्येकी एक मुख्य अभियंता घेऊन संदर्भ क्र. १ चे शासन निर्णयान्वये अभ्यासगट गठित करणेत आला आहे. तद्नंतर संदर्भ क्र. ३ चे शासन शुध्दीपत्रकान्वये सदरील अभ्यासगटामध्ये मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान, नाशिक यांचा समावेश करून कार्यकक्षेत वाढ करणेत आली. सदर अभ्यासगटाच्या कामाची व्याप्ती पाहता अहवाल परिणामकारकरित्या तयार करणेसाठी त्याचा कार्यकाळ संदर्भ क्र.४ चे शासन निर्णयान्वये दि. ३१ मे, २०१९ पर्यंत वाढविणेत आला होता. अहवाल अदयाप अप्राप्त आहे.

राज्यांतर्गत नदीजोड / वळण योजनांचा प्राधान्यक्रम ठरविणेसाठी प्रवाही वळण योजना तसेच उपसा वळण योजनांचे मापदंड तयार करणे, कोणत्या खोऱ्यात किती पाणी उपलब्ध आहे, कोणत्या खोऱ्यातून पाणी वळविता येईल याचा उपखोरेनिहाय अभ्यास करून त्याची प्राथमिक व्यवहार्यता ठरवून त्यानुसार प्राधान्यक्रम ठरविणे व एकात्मिक राज्य जलआराखडयाशी सुसंगत अहवाल तयार करणे अशी उपरोक्त अभ्यासगटाची विस्तृत व्याप्ती आहे. सबब अभ्यासगटाचा अहवाल तयार करताना सुसुत्रता व गतिमानता येण्याचे अनुषंगाने अभ्यासगटाची खालीलप्रमाणे पुनर्रचना व अभ्यासगटाचा कार्यकाळ वाढविणेची बाब शासनाचे विचाराधीन होती. त्यानुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णय अधिक्रमित करणेत येत असून सुधारित शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**<u>सुधारित शासन निर्णय :</u>**

राज्यांतर्गत नदीजोड / वळण योजनांचा प्राधान्यक्रम ठरविणेसाठी प्रवाही वळण योजना तसेच उपसा वळण योजनांचे मापदंड तयार करणे, कोणत्या खोऱ्यात किती पाणी उपलब्ध आहे, कोणत्या खोऱ्यातून पाणी वळविता येईल याचा उपखोरेनिहाय अभ्यास करून त्याची प्राथमिक व्यवहार्यता ठरवून त्यानुसार प्राधान्यक्रम ठरविणे व एकात्मिक राज्य जलआराखडयाशी सुसंगत अहवाल तयार करणे यासाठी पुढीलप्रमाणे अभ्यासगट गठीत करण्यात येत आहे:

**१) अभ्यासगटाची रचना :**

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | महासंचालक, मेरी, नाशिक | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव | सदस्य |
| ३ | मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई | सदस्य |
| ४ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद | सदस्य |
| ५ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | सदस्य |
| ६ | मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे | सदस्य |
| ७ | मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान, नाशिक | सदस्य |
| ८ | अधीक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना,(उसिंयो) नाशिक | सदस्य सचिव |

**२) अभ्यासगटाची कार्यकक्षा :**

१. कोणत्या खोऱ्यात किती पाणी उपलब्ध आहे व कोणत्या खोऱ्यातून पाणी वळविता येईल याचा उपखोरेनिहाय अभ्यास करून त्याची प्राथमिक व्यवहार्यता ठरविणे.
२. राज्यांतर्गत नदीजोड योजना/वळण योजना टप्प्या टप्प्याने हाती घेण्यासाठी सदर योजनांचे प्राधान्यक्रम निश्चित करणे.
३. प्रवाही वळण योजना तसेच उपसा वळण योजना यांचे मापदंड तयार करणे.
४. एकात्मिक राज्य जल आराखडयाशी सुसंगत अहवाल तयार करणे.
५. सदर अहवाल कार्यकारी संचालकांकडून संमत करून घेणे

**३) अभ्यासगटाचा कालावधी:**

सदर अभ्यासगटाचा कार्यकाळ दिनांक ३१ मार्च, २०२१ पर्यंत असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२०११०२१३१०४९६१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Rajnish Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, serialNumber=293016b5f13cd03f75c9f34c66d956309c8b3cd5faf07931d817577e6116e436, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2020.11.02 13:12:34 +05'30'

( र.रा.शुक्ला )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, मुंबई
४. मा. मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेते विधानसभा व विधानपरिषद
७. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव (प्रकल्प व समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१३. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१४. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
१५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद

१६. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
१७. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर
१९. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
२०. मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे
२१. मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई
२२. मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान, नाशिक
२३. अधीक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, (उसिंयो), नाशिक
२४. सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२५. जसंअ कार्यासन संग्रहार्थ